**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमीत्त कार्यक्रम/उपक्रम राबविण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आविवि-२०१५/ प्र.क्र.१५१/का.०५**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २१ आक्टोंबर २०१५

वाचा :- मंत्रिमंडळ निर्णय दिनांक २२ सप्टेंबर, २०१५.

**प्रस्तावना :**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रातील अमुल्य योगदान असून आधुनिक भारत घडविण्यामध्ये त्यांचा अत्यंत मोलाचा सहभाग आहे. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रति कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आणि त्यांनी केलेल्या संघर्षातून समाजाला प्रेरणा मिळावी यासाठी दि.१४ एप्रिल, २०१५ ते १४ एप्रिल, २०१६ हे वर्ष **"समता व सामाजिक न्याय वर्ष"** म्हणून साजरे करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक समता व सामाजिक न्याय प्रस्थापित होण्याच्या दृष्टीने आदिवासी विकास विभागांतर्गत विविध कार्यक्रम/उपक्रमांचे नियोजन करण्यासाठी एक समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ वे जयंती वर्ष दिनांक १४ एप्रिल, २०१५ ते १४ एप्रिल, २०१६ हे वर्ष **"समता व सामाजिक न्याय वर्ष"** म्हणून साजरे करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

त्यानुषंगाने सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक समता व सामाजिक न्याय प्रस्थापित होण्याच्या दृष्टीने विविध कार्यक्रम/उपक्रमांचे नियोजन व आयोजन करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | - | अध्यक्ष |
| २) | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३) | व्यवस्थापकीय संचालक, आदिवासी विकास महामंडळ यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४) | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर | - | सदस्य |
| ५) | सह आयुक्त (प्रशासन), आदिवासी आयुक्त कार्यालय, नाशिक | - | सदस्य सचिव |

समितीने खालील प्रस्तावित कार्यक्रम/उपक्रमाबरोबरच अन्य काही उपक्रमांचासुध्दा समावेश करुन प्रस्ताव तयार करावा :-

१) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारांवर आधारित परिसंवाद/चर्चासत्राचे आयोजन मध्यवर्ती ठिकाणी भव्य स्वरुपात करणे.
२) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे महत्वाचे ग्रंथ/पुस्तके शासकीय आश्रमशाळा/वसतीगृहे येथे उपलब्ध करणे.

३) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या दुर्मिळ छायाचित्रांचा समावेश असलेले सन २०१६ कॅलेंडर तयार करणे.
४) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे साहित्य PDF मध्ये आश्रमशाळांना उपलब्ध करुन देणे
५) भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्यावर निर्माण केलेला चित्रपट आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना दाखविणे.

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ वे जयंती वर्ष दिनांक १४ एप्रिल, २०१५ ते १४ एप्रिल, २०१६ हे वर्ष **"समता व सामाजिक न्याय वर्ष"** म्हणून साजरे करण्यासाठी कार्यक्रम/उपक्रमाची रुपरेषा व अपेक्षित खर्च याबाबतचा सर्वसमावेशक प्रस्ताव तयार करुन दोन आठवडयात शासनास सादर करावा तसेच शासनाची मान्यता प्राप्त करुन कार्यक्रम/उपक्रमाच्या अंमलबजावणीचे नियोजन व आयोजन करावे. समितीने अहवाल सादर करतांना आदिवासी विकास आयुक्तालय, आदिवासी विकास महामंडळ व आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था इत्यादींच्या विविध क्षेत्रीय अधिका-यांकडून कार्यक्रम/उपक्रमाच्या अंमलबजावणीची मासिक विगतवारी तसेच त्या-त्या यंत्रणांनी ज्या लेखाशीर्षामधून खर्च करावयाचा आहे त्याचा अंतर्भाव करावा.

सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचया www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१५१०२३११२१५६२५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.10.23 11:23:43 +05'30'

**(ल.गो. ढोके)**
शासनाचे उपसचिव

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सर्व विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानभवन, मुंबई
५) मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
६) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
८) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३) जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे
१४) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१५) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य आदिवासी सहकारी विकास महामंडळ, नाशिक
१७) व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त आणि विकास महामंडळ, नाशिक

१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हापरिषदा
१९) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर
२०) सह आयुक्त (प्रशासन), आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
२१) उप आयुक्त, आदिवासी विकास, नासिक/ठाणे/अमरावती/नागपूर
२२) सह आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२३) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
२४) वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
२५) निवडनस्ती, कार्यासन-०५

* * * * *